महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण यांना अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी अनुदान वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, उर्जा व कामगार विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीयुडी २०१५/प्र.क्र.२३५/ ऊर्जा-७

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २४ जून, २०१५

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक: अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थसं-३, दिनांक १७ एप्रिल,२०१५,

२) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांचे क्रमांक:लेखा / बीपी-००६ / एन.आर.एस.ई/१५-१६/ १५३८,१८४५, दिनांक २७ एप्रिल, २०१५ व २७ मे,२०१५ ची पत्रे.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण( महाऊर्जा) पुणे यांना सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाकरिता अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत राबवावयाच्या योजनांसाठी मुख्य लेखाशीर्ष " मागणी क्रमांक के-६, २८१०- अपारंपारिक ऊर्जा साधने "याखाली मंजूर असलेल्या तरतूदीतून महाऊर्जाला निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांनी केलेल्या विनंतीनुसार अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम (एन.आर.एस.ई.) अंतर्गत विविध योजनांच्या अंमलबजावणीसाठी महासंचालक,महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण,पुणे यांना रुपये ६,८६,००,०००/- (रुपये सहा कोटी शहाऐंशी लाख फक्त) इतके अनुदान वितरित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम अदा करण्यासाठी श्री. ब.शे. मांडवे, उप सचिव (ऊर्जा), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी व श्री. वि.म.राजूरकर, अवर सचिव, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर लेखानुदान महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण,पुणे (Director General, Maharashtra Energy Development Agency, Pune) यांच्या नांवे अदा करण्यात यावे.

४. अपारंपरिक ऊर्जा साधने अंतर्गत विविध योजनेवरील खर्चाचा, उद्दिष्टे, व प्रत्यक्ष साध्यता याबाबतच्या माहितीसह मासिक व त्रैमासिक अहवाल लगतच्या महिन्याच्या १० तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या लेखानुदानाची रक्कम केवळ अपारंपरिक ऊर्जा साधने कार्यक्रम ( एन.आर.एस.ई.) अंतर्गत विविध योजनांच्या अंमलबजावणीसाठी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी खर्च करण्यात येईल याची खातरजमा करण्यात यावी.

६. सदर लेखानुदान लेख्यासंबंधीची कागदपत्रे, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरणाने आवश्यक तेव्हा महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई यांच्याकडे तपासणीसाठी सादर करावीत.

७. याबाबतचा खर्च " मागणी क्रमांक के-६, २८१० अपारंपरिक ऊर्जा साधने, ८०० इतर खर्च, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजना (००)(०१) महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण ( २८१० ००३४ ), ३१ सहाय्यक अनुदाने ( वेतनेतर )" या लेखाशीर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५//अर्थ-३, दि.१७ एप्रिल,२०१५ च्या परिपत्रकास अनुसरुन काढण्यात येत आहे. ज्यानुसार सदर निधी या विभागाच्या अधिकारकक्षेत वितरीत करण्यात येत असून त्यास नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेची आवश्यकता नसल्याबाबत वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकात नमूद केले आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६२४१०५४२२३९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Parkar Suryakant V

Digitally signed by Parkar Suryakant V
DN: CN = Parkar Suryakant V, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Industries Energy & Labour
Date: 2015.06.24 10:56:06 +05'30'

**( सु. व. पारकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे म्हाडा कमर्शियल कॉम्प्लेक्स, सर्व्हे नं. १९१-ए- फेज, येरवडा, पुणे- ४११ ००६.
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा),मुंबई- ४०० ००१.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-२,( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा),नागपूर.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. अवर सचिव( रोख/प्रशासन ), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
९. अवर सचिव( ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१०.निवड नस्ती, ऊर्जा-७.